**महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळामार्फत राज्यातील इतर मागासवर्गीय प्रवर्गातील युवक-युवतींना कौशल्य विकास प्रशिक्षण देण्याकरीता योजना राबविण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन निर्णय क्रमाक : इमाव २०२१/प्र.क्र.७८/महामंडळे,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २१ फेब्रुवारी, २०२२.

**संदर्भ :-** १. शासन निर्णय क्र. कौविउ-२०१८/प्र.क्र.१२४/अभियान-१, दि.२०.०८.२०१९
२. महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीचे पत्र क्र. SSDS/MC/२०२०/७३६, दि.०७.१०.२०२०.
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ पत्र क्र. इमाविवि- २०२१/प्रकल्प/९००, दि.१२.११.२०२१.

**प्रस्तावना :-**

राज्यातील इतर मागासवर्गीय समाजातील परंपरागत व्यवसायाचे आधुनिकीकरण झालेले असल्यामुळे त्या परंपरागत व्यवसायात कार्यरत असलेल्या तसेच, इतर शैक्षणिक पात्रता धारण केलेल्या इतर मागासवर्गीय समाजातील पात्र व्यक्तींना आधुनिक प्रशिक्षणाचा लाभ व्हावा तसेच कौशल्य विकास प्रशिक्षण प्रदान करुन कौशल्यपूर्ण बनवणे व त्याद्वारे रोजगार किंवा स्वयंरोजगार उपलब्ध करुन देण्याचा हेतू शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त आणि विकास महामंडळामार्फत राज्यातील इतर मागासवर्गीय समूदायातील युवक-युवतींना कौशल्य विकास प्रशिक्षण देण्याकरीता योजना राबविण्याची मान्यता या शासन निर्णयान्वये देण्यात येत आहे. सदर योजना राबवितांना राज्य शासनाच्या ध्येय धोरणानुसार पत्करलेल्या सर्व दिशा-निर्देशांचे पालन महामंडळाने करावे. सदर योजनेचे स्वरुप व कार्यपध्दती खालीलप्रमाणे राहील.

१. **प्रशिक्षण कार्य :**

- महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळाकडून योजनेची प्रभावी मांडणी व अंमलबजावणी करण्याकरीता महामंडळास MSSDS या संस्थेने सहाय्य करणे.
- प्रशिक्षण कार्यक्रमाबाबत MSSDS च्या पोर्टलला महामंडळाच्या पोर्टलशी जोडणी करण्यात येईल.
- महामंडळाकडुन सदर पोर्टलचे Login, Credential Custmised करुन घेण्यात येईल.
- महामंडळ निवडक प्रशिक्षण कार्यक्रमाची निवड करुन त्याची अंमलबजावणी करेल.
- समुपदेशन उपक्रम, असंघटित क्षेत्रातील काम करणाऱ्या लोकांमध्ये जनजागृती आणि मार्गदर्शन कार्यक्रमास मदत व समर्थन करण्यासाठी MSSDS च्या जिल्हा यंत्रणेशी महामंडळाची जिल्हा यंत्रणा सहाय्य करील.
- किमान इयत्ता १० वी पास व पुढील शिक्षण घेतलेले इतर मागास प्रवर्गातील युवकांना परंपरागत तसेच कौशल्य विकासासाठी कार्यरत असणाऱ्या व्यावसायिक/ शैक्षणिक संस्था यांना प्रोत्साहित करुन सहाय्य करणे हा सदर कार्यक्रमाचा उद्देश आहे.

**२. महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटीच्या धर्तीवर वार्षिक प्रशिक्षण योजना**
(Skill India Portal (SIP) वर Accredited प्रशिक्षण संस्थेच्या प्राप्त प्रस्तावानुसार - )

| अ.क्र. | तपशील | एकुण | क्षमता |
|---|---|---|---|
| १. | एकुण Skill India Portal (SIP) वर Accredited खाजगी प्रशिक्षण संस्था | १३८१ | १,६५,६०० |
| २. | एकुण Skill India Portal (SIP) वर Accredited शासकीय प्रशिक्षण संस्था | ५९४ | ७५,४२० |
| | **एकुण** | **१९७४** | **२,११,०२०** |

| क्र. | स्टार रेटिंग | एकुण-खाजगी प्रशिक्षण संस्था | एकुण-शासकीय प्रशिक्षण संस्था |
|---|---|---|---|
| १. | ५- Star | ३५९ | १५४ |
| २. | ४- Star | ४७० | २०२ |
| ३. | ३- Star | ३७२ | १६१ |
| ४. | २- Star | १८० | ७७ |
| ५. | १- Star | ० | ० |
| | **एकुण** | **१३८१** | **५९४** |

उपरोक्त एकूण १९७४ या SIP Portal वरील संस्था राज्यात कार्यान्वित असून MSSDS सोसायटीकडून ५ -स्टार, ४- स्टार व ३ - स्टार संस्थांकडे प्रशिक्षणाबाबत कार्यवाही करण्यात येते. तसेच प्रशिक्षण संस्थांची **अर्हता** खालीलप्रमाणे निर्धारीत करण्यात येते :-

१. संस्थेकडे असलेल्या प्रशिक्षणाच्या सोई-सुविधा, संस्थेची पाहणी Online App द्वारे संपूर्ण पडताळणी, संस्थेकडील साधन सामुग्री, उच्च अर्हताप्राप्त प्रशिक्षक, अद्यावत सोई-सुविधा व प्रसाधनगृहासह संस्थेची इमारत.
२. NSDC मार्फत प्राप्त मानांकन ३) वेब पोर्टलच्या माध्यमातून दस्तऐवजाची Online पडताळणी.
३. त्रयस्थ संस्थांमार्फत प्रशिक्षण संस्थेची तपासणी. ५) NSDC या संस्थेशी संलग्न झालेल्या संस्थांचे प्रमाणिकरण करण्यात येते. ६) GIS मॅपिंग तसेच प्रशिक्षणार्थीकरीता Face Recognition App सुविधा.

**उपरोक्तनुसार महामंडळाकडून MSSDS च्या धर्तीवर ५, ४ व ३ स्टार मानांकन असलेल्या संस्थांचा प्रशिक्षणाबाबत विचार करण्यात येईल.**

**३. प्रशिक्षण योजना आणि देयक अदा करण्याच्या अटी -**

महामंडळामार्फत १८ ते ५० वयोगटातील इतर मागासवर्गीय प्रवर्गातील उमेदवारांसाठी **कौशल्य व उद्योजकता विकास अभियान (राज्य पुरस्कृत योजना)** अंतर्गत राबविण्यात येत आहे. त्यानुसार PMKVY प्रधानमंत्री कौशल्य विकास योजनेच्या धर्तीवर महामंडळाकडून प्रशिक्षण संस्थेस देयक अदा करण्याच्या अटी खालीलप्रमाणे आहेत :-

| **प्रशिक्षण संस्थांकरीता OBC महामंडळाच्या देयक अदा करण्याच्या अटी** | | |
|---|---|---|
| **अ.क्र** | **देयकांचा टप्पा** | **शेरा** |
| १ | टप्पा (३०%) | प्रशिक्षण सुरु झाल्यावर ७ दिवसांचे आत |
| २ | टप्पा (५०%) | प्रशिक्षण संपल्यानंतर (मूल्यमापन आणि प्रमाणीकरणाअंती) |
| ३ | टप्पा (२०%) | यशस्वी उमेदवारांना ६ महिन्यापर्यंत रोजगार/ स्वयंरोजगार उपलब्ध झाल्याबाबत विहित कागदपत्रे / पुरावे सादर केल्यानंतर |

प्रशिक्षण संस्थांकरीता देयक अदा करण्याच्या अटी प्रधान मंत्री कौशल्य विकास योजनेच्या अभियानाच्या धर्तीवर, प्रशिक्षणाबाबतची प्रशिक्षण संस्थेची जबाबदारी, प्रशिक्षणार्थींचे नोकरीचे नियुक्ती पत्र (Placement), अनुज्ञेय वेतन, व्यवसाय प्रमाणपत्र हे महामंडळाच्या जिल्हा व्यवस्थापकाकडून / जिल्हा व्यवसाय प्रशिक्षण अधिकारी यांचेमार्फत तपासून, संबंधीत आस्थापनेस स्वतंत्र भेट देवून त्याबाबतची खातरजमा महामंडळ व संबंधीत जिल्हयातील यंत्रणेकडून करुन देयक अदा करण्यात येईल.

**४. प्रशिक्षण : सेक्टर आणि कोर्सेस निवड**

- राज्य महामंडळाने निवड केलेल्या अभ्यासक्रमातून उमेदवारास त्याच्या कल चाचणीच्या आधारावर अभ्यासक्रम निवड करण्याची मुभा असेल.
- बाजारपेठेतील उपलब्ध असणाऱ्या सेवा/ नोकऱ्या यांची मागणी विचारात घेऊन प्रशिक्षण अभ्यासक्रम राज्य महामंडळामार्फत निवडण्यात येईल.

**५. लक्ष्य वाटप**

- राज्य महामंडळामार्फत निवड केलेल्या सेक्टर व जॉब रोल नुसार आणि जिल्हयातील मागणीनुसार उद्दिष्टे- लक्षांक निश्चित करण्यात येतील.

**६. प्रशिक्षण संस्था निवड**

- प्रशिक्षण संस्थांना Skill India Portal (SIP) वर नोंदणी अनिवार्य राहील.
- तद्नंतर प्रशिक्षण संस्थांची निवड करताना संबंधित संस्थेकडील पायाभुत सोई-सुविधा, उपलब्ध करुन दिलेला रोजगार अथवा स्वयंरोजगार, प्लेसमेंटसाठी विविध उद्योजकांसमवेत टाय-अप, स्वयंरोजगारासाठी अर्थसहाय्य करणाऱ्या संस्थेसमवेत टाय-अप.ई.बाबी तपासणे हे काम (MSSDS) धर्तीवर महामंडळामार्फत करुन प्रशिक्षण संस्थेची निवड करण्यात येईल.

**७. उमेदवारांची जमवाजमव आणि समुपदेशन करणे.**

- महामंडळाच्या प्रशिक्षण कार्यक्रमाचा प्रचार आणि प्रसार जिल्हा कार्यालयांमार्फत करण्यात येईल.
- उमेदवारांची निवड कराण्यासाठी मेळाव्यांचे आयोजन महामंडळाचे जिल्हा कार्यालय तसेच कौशल्य विकास सोसायटीच्या माध्यमातून करण्यात येईल.
- उमेदवारांची वैयक्तिक, शैक्षणिक अर्हता व इतर महामंडळाच्या आवश्यकतेनुसार माहिती संकलित करुन पडताळणी जिल्हा कार्यालयामार्फत करण्यात येईल.

- उमेदवार निवडीसाठी जिल्ह्यांमध्ये मेळाव्याचे आयोजन व सदर प्रशिक्षण कार्यक्रमाबाबत प्रचार, प्रसार व मार्गदर्शन करण्यासाठी इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ यांचे जिल्हा व्यवस्थापक आणि MSSDS चे जिल्हास्तरीय प्रतिनिधी हे संयुक्तरित्या कामकाज करतील.

**८. उमेदवारांची नाव नोंदणी :**

- उमेदवारांच्या शैक्षणिक अर्हता व इतर आवश्यक कागदपत्रांची पडताळणी महामंडळाच्या जिल्हा कार्यालयाकडून करण्यात येईल.
- MSSDS च्यावेब पोर्टलवर/ OBC च्या पोर्टलवर उमेदवारांची नाव नोंदणी करणे अनिवार्य राहील.
- संबंधीत कोर्सच्या प्रशिक्षणासाठी किमान २० प्रशिक्षणार्थींनी निवड केल्यानंतर इच्छूक लाभार्थींना तसेच संबंधीत संस्थेस याबाबत महामंडळाकडून कळविण्यात येईल.
- लाभार्थीस पोर्टलवर इमाव प्रवर्गाचे जात प्रमाणपत्र, उत्पन्नाचे प्रमाणपत्र रु.८.०० लक्षपर्यंतचे ( एकत्रित कुटूंबाचे ), वय व रहिवासी दाखला, आधार कार्ड, UID अपलोड करावे लागेल.

**९. प्रशिक्षण :**

- निवड झालेल्या उमेदवारांची कोर्सेस प्रमाणे प्रशिक्षण तुकड्या तयार करणे.
- प्रशिक्षण संस्थांकडुन प्रशिक्षण तुकड्या विहित कालावधीत पूर्ण करणे.
- उमेदवारांची दैनंदिन हजेरी (बायोमेट्रिक्स) नोंदविणे.
- संबंधित प्रशिक्षण संस्थांना प्रशिक्षण कालावधीत अचानक भेटी देवुन बायोमेट्रिक्स हजेरी व संबंधित अहवालाची पडताळणी महामंडळाच्या जिल्हा कार्यालयाकडून करण्यात येईल.
- प्रशिक्षण समाप्तीनंतर याबाबतचा सविस्तर अहवाल महामंडळाच्या जिल्हा कार्यालयाकडून महामंडळाच्या मुख्यालयास जिल्हा व्यवस्थापक सादर करतील.

**१०. प्रशिक्षणोत्तर कार्यवाही :**

- प्रशिक्षण संस्थांनी यशस्वीरित्या प्रशिक्षण पूर्ण करणाऱ्या उमेदवारांना योजनेतील अटीनुसार रोजगार किंवा स्वयंरोजगार उपलब्ध करुन देणे.
- प्रशिक्षण संस्थानी किमान ६ महिन्यांपर्यंत उमेदवाराच्या स्वयंरोजगाराबाबत पाठपुरावा करावा.
- इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ व MSSDS यांच्या प्रतिनिधींनी उमेदवार रोजगार किंवा स्वयंरोजगार करत असलेल्या ठिकाणी अचानक भेटी देणे.

**११. वेबपोर्टल कार्य अंमलबजावणी :**

- MSSDS मार्फत प्राप्त झालेल्या प्रस्तावातील पर्याय क्र.२ मधील कार्यासोबतच MSSDS संस्थेस वेबपोर्टलमध्ये महामंडळाकडून मागणीप्रमाणे स्वनिर्धारित आवश्यकतेनुसार बदल करुन द्यावे लागतील.

(MIS Reporting login, DDR duo delitions report)

**१२. मुल्यांकन व यशोगाथा :**

- प्रशिक्षण बॅचमधील उमेदवारांची यशोगाथा तयार करणे.
- प्रशिक्षण व प्रशिक्षणानंतरच्या कार्यवाहीचा सविस्तर अहवाल महामंडळाचे जिल्हा

व्यवस्थापक व MSSDS प्रतिनिधी संयुक्तरित्या सादर करतील व त्यास प्रसिध्दी देतील.

ITI, प्राचार्य हे तालुका कौशल्य कमिटीचे अध्यक्ष असून प्रशिक्षणावर देखरेख त्यांचेमार्फत करण्यात येते.

त्याच धर्तीवर सदर योजनेकरीता ITI, प्राचार्य यांची “तालुका देखरेख समिती” वर नियुक्ती करण्यात येत आहे.

## १३. सहभागधारक आणि त्यांची भूमिका

### १३.१ महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्यादित विभाग :

संपुर्ण प्रशिक्षण कार्यक्रमासाठी निधी व वितरण महामंडळामार्फत करण्यात येईल.

१. संपूर्ण प्रशिक्षण कार्यक्रम महामंडळामार्फत राबविण्यात येईल.
२. कौशल्य प्रशिक्षणाचे क्षेत्र (Sector) व अभ्यासक्रम (Job Role) ची निवड करणे.
३. सदर प्रशिक्षणसाठी सेक्टर व जॉब रोल नुसार आणि जिल्हानिहाय उद्दिष्टे/ लक्षांक निश्चित करणे.
४. उमेदवारांची जमवाजमव करण्यासाठी मेळावे आयोजित करण्यासाठी आवश्यक ते सर्व सहकार्य करणे.
५. सदर कार्यक्रमाचा प्रचार, प्रसार, प्रसिद्धी विविध माध्यमातुन करणे.
६. पात्र उमेदवारांची निवड करणे.
७. प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी संस्थांची निवड करणे:
   - महाराष्ट्र कौशल्य विकास सोसायटी तसेच, स्किल इंडिया पोर्टलवर नोंदणीकृत असलेल्या संस्थांमधुन ज्या किमान २० उमेदवारांची प्रशिक्षण लक्षांक निश्चित करणे. PMKUVA अथवा PMKVY योजनेच्या धर्तीवर प्रशिक्षण संस्था निवड करणे आणि उद्दिष्ट वितरीत करणे.
   - प्रशिक्षण संस्थांची निवड महामंडळाच्या मुख्यालयाकडून समितीमार्फत करण्यात येईल.
८. महामंडळाकडून निवड केलेल्या उमेदवारांच्या यादीस अंतिम मान्यता दिल्यानंतर प्रशिक्षण संस्थांकडून प्रशिक्षण कार्यक्रम सुरु करण्यात येतील.
९. उपक्रमांतर्गत नियंत्रण, नियोजन, अंमलबजावणी आणि देखरेख इ.करणे.
१०. संबंधित प्रशिक्षण संस्थांना प्रशिक्षण कालावधीत अचानक भेटी देवुन बायोमेट्रिक्स हजेरी व संबंधित अहवालाची संयुक्त पडताळणी करणे.
११. प्रशिक्षणाअंतीचे मुल्यमापन अपलोड करणे.

प्रशिक्षण पुर्ण झाल्यानंतर तसेच, मूल्यमापन (Assessment) पश्चात पात्र उमेदवारांना रोजगार तसेच, स्वयंरोजगाराच्या संधी उपलब्ध करुन देण्यासाठी दोन्ही विभाग एकत्रितरित्या प्रयत्न करतील. यासाठी औद्योगिक संस्थांसोबत एकत्रित रोजगार मिळावे, वेबीनार तसेच, समुपदेशन सत्रे आयोजित करण्यात येतील.

### १३.२ महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी (MSSDS)

१ कौशल्य प्रशिक्षणाचे संपुर्ण कामकाज MSSDS / OBC महामंडळाच्या वेब पोर्टलद्वारे करणे.
२ प्रशिक्षण सेक्टर व जॉब रोल ची निवड आणि लक्ष्य वाटप करण्यासाठी आवश्यक सहाकार्य करणे.

३ प्रशिक्षण संस्थांच्या निवड करण्यासाठी इतर मागासवर्गीय वित्त व विकास महामंडळास आवश्यकक सहाकार्य करणे.

४ प्रशिक्षणासाठी उमेदवारांची निवड करण्यासाठी आवश्यक सहकार्य करणे.

५ प्रशिक्षण सुरु असलेल्या प्रशिक्षण संस्थांना संयुक्त पर्यवेक्षीय भेटी देणे.

६ उमेदवार रोजगार किंवा स्वयंरोजगार करत असलेल्या ठिकाणी संयुक्त भेटी देऊन तपासणी करणे.

७ प्रशिक्षण कार्यक्रमाचे मुल्यांक (Evaluation) करण्यासाठी तसेच बॅचमधील रोजगार किंवा स्वयंरोजगार प्राप्त झालेल्या उमेदवारांची यशोगाथा तयार करणे.

८ महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंउळ मर्यादित विभागाकडुन प्राप्त झालेल्या ०.५% निधीचे वेळोवेळी उपयोगिता प्रमाणपत्र अहवाल सादर करणे.

**१३.३ जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र यांची जबाबदारी :**

१. प्रशिक्षण संस्थांच्या निवड करण्यासाठी इतर मागासवर्गीय वित्त व विकास महामंडळास आवश्यक सहकार्य करणे.

२. प्रशिक्षण सुरु असलेल्या प्रशिक्षण संस्थांना महामंडळाच्या अधिकारी समवेत संयुक्त भेटी देणे.

३. रोजगार अथवा स्वयंरोजगार प्राप्त झालेल्या अमेदवारांच्या ठिकाणी प्रत्यक्ष भेटी देवून संबंधित नियोक्ता किंवा व्यवसायाची पडताळणी करणे.

**१३.४ व्यवसाय प्रशिक्षण संस्था (TC) यांची जबाबदारी :**

१ महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या. मार्फत निवड केलेल्या अभ्यासक्रमाचे पात्र उमेदवारांना प्रशिक्षण देणे.

२ प्रशिक्षण तुकडी सुरु झाल्यानंतर प्रत्येक उमेदवारांची दैनंदिनी हजेरी बायोमेट्रिक पद्धतीने नोंदविणे.

३ प्रशिक्षणा दरम्यान प्रमोद महाजन कौशल्य विकास व उद्योजकता अभियान (PMKUVA) या योजनांच्या सर्व निकष आणि अटींचे पालन करणे.

४ MSSDS, इतर मागासवर्गीय वित्त व विकास महामंडळ, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय अधिनस्त विभागीय व जिल्हा कार्यालय यांनी वेळोवेळी दिलेल्या सुचनांचे पालन करणे.

५ प्रशिक्षण पुर्ण झाल्यानंतर पात्र उमेदवारांना योजनेतील अटीनुसार रोजगार किंवा स्वयंरोजगार उपलब्ध करुन देणे.

६ प्रशिक्षणाचा व प्रशिक्षणा नंतरच्या कार्यवाहीचा सविस्तर अहवाल आवश्यकते नुसार वेळोवेळी सादर करणे.

७. रोजगार किंवा स्वयंरोजगार उपरांत किमान सहा महिनेपर्यंत उमेदवारांचा पाठपुरावा करणे यांचे मार्गदर्शन समुपदेशन करणे, त्यासाठी उमेदवारास रोजगार किंवा स्वयंरोजगार प्राप्त झालेल्या ठिकाणी प्रत्यक्ष भेटी देणे.

८. प्रशिक्षणाबाबतच्या संपूर्ण कार्यवाहीसाठी महामंडळाकडून विहीत नमुन्यात पुरविण्यात आलेल्या करार पत्रावर प्रशिक्षण संस्थेस प्रशिक्षणापूर्वी करार करुन द्यावा लागेल.

९. SIP पोर्टलवर नोंद न झालेले तथापि, ज्यातून जास्त रोजगार निर्माण होतील असे अभ्यासक्रम निवडण्याचे अधिकार महामंडळास असतील याबाबतची संपूर्ण कार्यवाही (नोंदणी ते प्रशिक्षण) निवड केलेल्या संबंधित संस्थेस करावे लागेल.

१०. संचालक मंडळाच्या मान्यतेने महामंडळ ठरवेल ती जबाबदारी.

## १४. मूल्यमापन संस्था

- योजनेतील अटींनुसार प्रशिक्षण पूर्ण झाल्यानंतर MSSDS व महामंडळाच्या जिल्हा कार्यालयाच्या संयुक्त विद्यमानाने उमेदवारांची परिक्षा घेणे.
- मूल्यमापनात यशस्वी झालेल्या उमेदवारांना MSSDS व महामंडळामार्फत संयुक्त स्वाक्षरीने विहित प्रमाणपत्र देणे.

## १५. निवड केलेले प्रशिक्षण अभ्यासक्रम :

- राज्यातील इमाव संवर्गातील लोकांच्या मागणीनुसार तसेच, त्यांच्या परंपरागत व्यवसायाच्या आधुनुकिकरणासाठी आवश्यक प्रशिक्षण अभ्यासक्रमाची निवड करण्यात येईल.
- महामंडळाने निवड केलेल्या प्रशिक्षणाचे अभ्यासक्रमातून प्रशिक्षणार्थींनी अभ्यासक्रमाची निवड करणे आवश्यक असून याकरीता प्रशिक्षणार्थींना अभ्यासक्रम निवडीस सुलभता व्हावी याकरीता वेबपोर्टलवर निवड केलेले अभ्यासक्रम उपलब्ध करुन देण्यात येतील. तसेच सदर अभ्यासक्रम प्रशिक्षण कार्यक्रमाची माहिती महामंडळाच्या वेबपोर्टलवरही अपलोड करून घेण्यात येईल.
- महामंडळाकडून उच्च क्षेत्रातील मागणी असलेल्या अभ्यासक्रमाची प्राथमिक स्वरुपात निवड करण्यात येईल व त्यात नविन अभ्यासक्रमाचा समावेश मागणीनुसार महामंडळामार्फत करण्यात येईल.

## १६. योजनेकरीता आवश्यक निधी :

सदर योजनेसाठी प्रतिवर्षी रु. २०.०० कोटी (अक्षरी रुपये वीस कोटी फक्त) इतक्या रकमेच्या मर्यादेत खर्च करण्यास शासन याद्वारे परवानगी देत आहे.

या योजनेचा आढावा १ वर्षानंतर घ्यावा व सदरची योजना यापुढे सुरु ठेवावी किंवा बंद करावी याबाबतचा निर्णय घेण्यात यावा. तसेच प्रत्येक १ वर्षानंतर योजनेबाबतचा अहवाल शासनास सादर करण्यात यावा.

**सदर योजना महामंडळास उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीच्या मर्यादेत राबविण्यात यावी. सदर** योजनेवरील खर्च हा मागणी क्र. झेडजी-०३,२२२५, अनुसुचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण,०३, मागासवर्गीयांचे कल्याण, १०२, आर्थिक विकास, (०१) (०५) महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त आणि विकास महामंडळ या महामंडळास सहाय्यक अनुदान प्रधान लेखाशिर्ष २२२५ एफ २५४ या लेखाशिर्षाखाली उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या आर्थिक तरतूदींमधून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०२२११२४९२३७८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

VARSHA SUNIL SAMANT

Digitally signed by VARSHA SUNIL SAMANT
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=OTHER BACKWARD BAHUJAN KALYAN DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=765dae4fef3315c4544a15270edc443fbacf630172f5e6b732d16b64198d81ba, serialNumber=af4e3a3aadaca1026547ef614df4de89d66994806d3760116b32bb3aadeaf9fb, cn=VARSHA SUNIL SAMANT
Date: 2022.02.21 12:52:05 +05'30'

**( व. सु. सामंत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव
३. मा. विरोधी पक्ष नेता (विधानसभा / विधान परिषद), महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
४. मा.सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
५. अध्यक्ष / उपाध्यक्ष / व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ, मुंबई
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
७. मंत्रालयीन विभागाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव
८. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. संचालक, इतर मागास बहुजन कल्याण, संचालनालय, पुणे.
१०. महाराष्ट्र राज्य कौशल्य विकास सोसायटी, महापालिका मार्ग, धोबी तलाव, मुंबई.
११. प्राचार्य, व्यवसाय प्रशिक्षण संस्था. (आय.टी.आय)
१२. जिल्हा कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता मार्गदर्शन केंद्र
१३. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, कोकण भवन, नवी मुंबई (दोन प्रती)
१४. महालेखापाल (ले. व अ.) महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर
१५. महालेखापाल (ले.प.) महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / जिल्हा कोषागार अधिकारी मुंबई / ठाणे
१७. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१८. वित्त विभाग (का-व्यय-१४/अर्थोपाय/अर्थसंकल्प-३/साउ)मंत्रालय, मुंबई
१९. नियोजन विभाग(का.१४१३), मंत्रालय, मुंबई
२०. सह संचालक, लेखा व कोषागार, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मुंबई.
२१. सर्व जिल्हा व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ मर्या.
२२. प्रधान सचिव, (इ.मा.ब.क.) यांचे स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
२३. सह सचिव, (इ.मा.ब.क.), विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४. निवडनस्ती (महामंडळे), विजाभज, इमाव व विमाप्र कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई.